गट–क व गट–ड (पूर्वीचे वर्ग-3 व वर्ग-4) मधील कर्मचा–यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने असलेली कुंठितता घालविण्यासंबंधीची योजना.

मुद्यांचे स्पष्टीकरण.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन निर्णय क्रमांक: एसआरव्ही- 1095/प्र.क्र.33/95/बारा,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक: 1 नोव्हेंबर 1995.

संदर्भ:-- शासन निर्णय, सा.प्र.वि. क्रमांक: एसआरव्ही–1095/प्र.क्र.1/95/बारा, दिनांक 8 जून, 1995

## शासन निर्णय

शासन सेवेत गट–क व गट–ड संवर्गात पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नाहीत किंवा उपलब्ध असल्या तरी पदोन्नती मिळण्यास प्रदिर्घ कालावधी लागतो. अशा कर्मचा–यांना 12 वर्षाच्या नियमित सेवेनंतर वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी देण्याबाबतचे आदेश सदर्भाधीन दिनांक 8 जून, 1995 रोजीच्या शासन निर्णयाद्वारे निर्गमित करण्यात आले आहेत. वरिष्ठ वेतनश्रेणी देण्याबाबत अवलंबावयाची कार्यपध्दत, अटी व शर्ती देखील सदर शासन निर्णयात नमूद करण्यात आल्या आहेत

2. 12 वर्षाच्या नियमित सेवेनंतर वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी देण्याबाबतच्या योजनेची प्रत्यक्ष अंमलबजावणी करताना तसेच त्या अनुषंगाने विभागांना येणा–या अडचणीबाबत काही शंका उपस्थित करण्यात आलेल्या होत्या, त्यातील सामाईक स्वरूपाच्या मुद्यावर स्पष्टीकरणात्मक आदेश निर्गमित करण्याचे विचाराधीन आहे. या विभागाच्या निदर्शनास आलेले सामाईक मुद्दे व त्यावरील स्पष्टीकरण सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्टात देण्यात आलेले आहे.

3. सर्व विभागांनी आणि सदर योजना राबविणा–या अधिका–यांनी त्यांचेकडील कर्मचा–यांची प्रकरणे निकालात काढताना सदर स्पष्टीकरणात्मक सूचनांप्रमाणे कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

य. मा. जोशी

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

मुख्यमंत्री यांचे सचिव,

उप मुख्यमंत्री यांचे सचिव

सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,

सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

(पुढे चालू)

शाम/एन 1133(5,000-11-95)-1.

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,

* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,

* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र–1, (लेखा व हक्कदारी), मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र -1, (लेखा परीक्षा), मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र- 2, (लेखा व हक्कदारी), नागपूर,

महालेखापाल, महाराष्ट्र -2, (लेखा परीक्षा), नागपूर,

शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरुन),

निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

मुख्य लेखा परीक्षा (निवासी लेखा), कोकण भवन, नवी मुंबई,

सर्व विभागीय आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

वित्त विभाग,/का. सेवा–3,

निवड नस्ती.

* पत्राने.

शासन निर्णय क्र.एसआरव्ही-1095/प्र.क्र.33/95/बारा, दिनांक 1 नोव्हेंबर 1995 चे परिशिष्ट.

| अ.क्र. 1. | उपस्थित मुद्दा. 2. | स्पष्टीकरण 3. |
|---|---|---|
| 1. | शासनाच्या सेवेत असणा-या किंवा भविष्यात येणा-या माजी सैनिकांची संरक्षण दलातील सेवा कुंठीतता घालविण्याच्या योजनेसाठी ग्राह्य धरता येईल काय ? | नाही. दि.8.6.95 च्या शासन निर्णयातील परि.2(क) मध्ये उल्लेख केलेली 12 वर्षाच्या सेवेची गणना करण्यासाठी राज्य शासनाकडील पदांवरील नियमित सेवाच गृहीत धरावयाची असल्याने संरक्षण दलातील वा अन्य सेवा या प्रयोजनासाठी ग्राह्य धरता येणार नाहीत. |
| 2. | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील कर्मचारी प्रथम रोजंदारीवर सरळ सेवेने नियुक्त झालेले असतात. यास्तव अशा रुपांतरीत आस्थापने-वरील कर्मचा-यांची 12 वर्षांची सेवा प्रथम नियुक्तीच्या दिनांकापासून गणण्यात यावी किंवा कसे ? | दि.8.6.95 च्या शासन निर्णयात स्पष्ट केल्यानुसार पदधारकांची पदावरील 12 वर्षांची नियमित सेवा होणे आवश्यक आहे. रोजंदारीवरील सेवा ही नियमित सेवा नसल्याने रोजंदारीवरील नियुक्तीच्या/प्रथम नियुक्तीच्या दिनांकापासून 12 वर्षाचा कालावधी गणणे अभिप्रेत नाही. |
| 3. | वरिष्ठ वेतनश्रेणी देतेवेळी कर्मचा-यांची नियमित सेवा 12 वर्षे पूर्ण होईल त्या दिनांकापासून वरिष्ठ वेतनश्रेणी द्यावी किंवा परिपत्रकात दर्शविल्याप्रमाणे 1.10.94 रोजी द्यावी. | सदर योजना दि.1.10.94 पासून अंमलात आली असल्याने 12 वर्षांची (एकाच पदावरील) नियमित सेवा झालेल्यांना दि.1.10.94 किंवा त्यानंतर 12 वर्षांची सेवा झाल्याचा जो दिनांक असेल त्या दिनांकास वरिष्ठ श्रेणी देणे अभिप्रेत आहे. कोणत्याही परिस्थितीत या योजनेखालील वरिष्ठ वेतनश्रेणी दि.1.10.94 पूर्वीच्या दिनांकापासून देता येणार नाही. |
| 4 | 12 वर्षाच्या नियमित सेवेनंतर वरिष्ठ वेतनश्रेणी देतेवेळी (शासन निर्णयातील परि.2(ब) प्रमाणे पूर्तता झाल्यावर) वेतननिश्चिती करतांना नियमित पदोन्नतीप्रमाणे वेतनवाढ देऊन वेतननिश्चिती करावी किंवा कसे ? | होय. वरिष्ठ वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करताना ती नियमित पदोन्नतीनंतरच्या वेतननिश्चितीप्रमाणे महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमातील नियम 11(1)(ए) अनुसार करावयाची आहे. तथापि वरिष्ठ वेतनश्रेणीतील अशा वेतननिश्चितीनंतर नियमित पदोन्नतीचे वेळी वेतननिश्चितीचा याच नियमांतर्गत पुन्हा फायदा देय होणार नाही. |
| 5. | शासन निर्णय दि.8.6.95 अन्वये गट 'क' व 'ड' मधील पदधारकांना 12 वर्षाच्या नियमित सेवेनंतर त्यांच्या पदोन्नती साखळीतील वरच्या पदाची वेतनश्रेणी देण्यात येईल असे नमूद केले आहे. तथापि परिशिष्टात रु.950-1500 वेतनश्रेणीला रु.1200-2040 ही वरिष्ठ वेतनश्रेणी दर्शविली आहे. | दि.8.6.95 च्या शासन निर्णयातील परि.2 मध्ये स्पष्ट केल्याप्रमाणे ज्या पदांस पदोन्नती साखळीतील वरिष्ठ पद अस्तित्वात आहे, तेथे त्या वरिष्ठ पदाची वेतनश्रेणी सदर योजनेअंतर्गत द्यावयाची आहे. परिशिष्टातील वेतनश्रेणी अशा प्रकरणात विचारात घ्यावयाच्या नाहीत.<br>ज्या पदांना पदोन्नतीसाखळीत वरिष्ठ पद अस्तित्वात नाही किंवा जी |

| 1. | 2. | 3. |
| --- | --- | --- |
| | | एकाकी ( Isolated ) पदे आहेत, केवळ अशा पदांचेबाबत परिशिष्टातील वेतनश्रेणी विचारात घ्यावयाची आहे. |
| 6. | कार्यालयात वेगवेगळ्या तारखांना वेगवेगळ्या कर्मचा-यांची 12 वर्षांची सेवा पूर्ण होईल अशा परिस्थितीत वेळोवेळी पदोन्नतीसाठीची पात्रता अजमावण्याची कार्यपध्दती अवलंबिणे कार्यालयास शक्य होणार नाही. तरी वर्षातून एकदाच ह्या कार्यपध्दतीचा अवलंब करून पात्र कर्मचा-यांना वरिष्ठ वेतनश्रेणी देय असल्याचे दिनांक जाहीर करणे शक्य होईल किंवा कसे. | कमी संख्याबळाचे कार्यालय असल्यास कर्मचा-याची 12 वर्षे नियमित सेवा होईल त्यावेळी वरिष्ठ वेतनश्रेणी देण्याकरिता विहित कार्यपध्दती अवलंबून निर्णय घेण्यास अडचण येईल असे वाटत नाही. तथापि एकवाक्यता रहावी म्हणून दरवर्षी सप्टेंबर महिन्यात विभागीय पदोन्नती समितीच्या बैठका घेण्यात येतात. त्याच धर्तीवर सप्टेंबर महिन्यात एप्रिल ते पुढील मार्च पर्यंतच्या कालावधीत विहित नियमित 12 वर्षांची सेवा पूर्ण करणा-या कर्मचा-यांच्या अलिकडील ( latest ) 5 वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या आधारे वरिष्ठ वेतनश्रेणी देण्याकरिता विचार करावा. मात्र प्रत्यक्षात वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ संबंधितांना त्या पदावरील 12 वर्षांची नियमित सेवा झाल्यानंतरच देण्यात यावा. |
| 7. | दि.1.10.94 ते 8.6.95 या कालावधीत जे कर्मचारी नियमित पदोन्नतीस पात्र असून ज्यांनी अशी पदोन्नती नाकारली अशा कर्मचा-यांना या योजनेचा लाभ मिळू शकेल काय? | योजनेचा मूळ उद्देश पदोन्नतीस पात्र असूनही पदोन्नती मिळत नसणा-यांना वरिष्ठ वेतनश्रेणी देण्याची असल्याने दि.1.10.94 पूर्वी अथवा नंतर नियमित पदोन्नती नाकारणा-यास तसेच पदोन्नतीस अपात्र ठरलेल्या कर्मचा-यास या योजनेखाली वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ देणे अभिप्रेत नाही. या संदर्भात दि.8.6.95 च्या शासन निर्णयातील परिच्छेद 2 मधील "य" मधील अट पुरेशी स्पष्ट आहे. |
| 8. | दि.1.10.94 ते 8.6.95 या कालावधीत जे कर्मचारी नियमित पदोन्नतीस अपात्र होते अशा कर्मचा-यांना या योजनेचा लाभ मिळू शकेल काय? | एकदा नियमित पदोन्नती नाकारलेल्या कर्मचा-यास त्यानंतर केवळ ज्येष्ठतेनुसार व पदोन्नतीसंबंधीच्या सर्वसाधारण तत्वाप्रमाणे पुढील कालावधीत केवळ नियमित पदोन्नतीसाठीच विचारात घेण्यात यावे. अशा कर्मचा-यांचा या योजनेखाली वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ मिळण्यासाठी विचार करता येणार नाही. |



(पुढे चालू)

| 1. | 2. | 3. |
|---|---|---|
| 9. | ज्या कर्मचा–यांना पदोन्नती साखळीतील पदावर पदोन्नतीसाठी पद अस्तित्वात नाही (उदा. दूरध्वनी चालक) अशा कर्मचा–यांना या योजनेअंतर्गत 12 वर्षाच्या नियमित सेवेनंतर वरिष्ठ वेतनश्रेणी किती वेळा अनुज्ञेय राहील ? | दि.8.6.95 च्या शासन निर्णयातील परिच्छेद 2 'क' मध्ये स्पष्ट केल्यानुसार या योजनाअंतर्गत केवळ एक वेळ वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय असेल. |
| 10. | गट "ड" मधील कर्मचा–यांना पदोन्नती साखळीतील विविध पदे उपलब्ध आहेत. (उदा.(1) एस.एस.सी. उत्तीर्ण झालेल्यांना गट "क" मधील पदावर पदोन्नती मिळू शकते. (2) आठवी इयत्ता उत्तीर्ण झालेल्यांना व्रणोपचारक/दप्तरबंद) त्यामुळे सदर योजनेखाली नेमकी कोणती वेतनश्रेणी मिळेल ? | "ड" वर्गातील कर्मचारी ज्या पदावर कार्यरत असेल त्या पदाच्या लगतच्या वरिष्ठ पदोन्नतीचे पदाची वेतनश्रेणी संबंधितांना देय होईल. एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर 'क' वर्गातील पदावर मिळणारी पदोन्नती या योजनेसाठी 'ड' वर्गातील पदाच्या पदोन्नतीसाखळीतील समजता येणार नाही. कारण ती विशिष्ट अर्हता धारण करणा–यांपुरतीच मर्यादीत आहे. |
| 11. | कर्मचा–याने धारण केलेल्या पदाची श्रेणीवाढ होऊन त्याच कर्मचा–यास श्रेणीवाढ केलेल्या पदावर नियुक्त केले असल्यास 12 वर्षाच्या नियमित सेवेचा कालावधी केव्हापासून मोजावा तसेच वेतनश्रेणी तीच असून केवळ पदनाम बदललेले असेल किंवा पद त्याच वेतनश्रेणीतील अन्य पदात रुपांतरीत समाविष्ट झाले असल्यास पदधारकास वरिष्ठ वेतनश्रेणीचा फायदा कसा देण्यात यावा ? | पूर्वी धारण केलेल्या मूळ पदाची श्रेणीवाढ झाल्यावर कर्मचा–यास श्रेणीवाढ पदावर नियुक्ती मिळाली असल्यास त्या श्रेणीवाढ झालेल्या पदावरील 12 वर्षाच्या नियमित सेवेनंतरच दि.8.6.95 च्या शासन निर्णयातील इतर अटी व शर्तीनुसार वरिष्ठ वेतनश्रेणी अनुज्ञेय होईल.<br>वेतनश्रेणी तीच असून केवळ पदनाम बदलले असेल किंवा त्याच वेतनश्रेणीतील अन्य पदात रुपांतर/समाविष्ट केले असल्यास किंवा निव्वळ वेतनश्रेणीत सुधारणा झाली असल्यास मूळ पदावरील 12 वर्षाच्या नियमित सेवेनंतर वरिष्ठ वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय होईल. |
| 12. | मूळ वेतनश्रेणीत 12 वर्षाच्या सेवेनंतर किंवा त्यापूर्वी दक्षतारोध असल्यास दक्षतारोध पार न करता वरिष्ठ वेतनश्रेणी देता येईल काय ? | मूळ वेतनश्रेणीत असलेला दक्षतारोध पार केल्याशिवाय वरिष्ठ वेतनश्रेणी देता येणार नाही. |



(पुढे चालू)

| 1 | 2. | 3. |
| --- | --- | --- |
| 13. | सदर योजना राबविण्याचे अधिकार कोणाला असतील ? | सदर योजना गट 'क' व 'ड' मधील कर्मचा-यापुरतीच मर्यादीत असल्याने या गटातील पदांवर नियुक्त्या/पदोन्नती करण्यास सक्षम असलेले अधिकारी ही योजना राबविण्यास सक्षम असतील. |
| 14. | उच्च वेतनश्रेणीत वेतननिश्चितीनंतर पुढील वेतनवाढीचा दिनांक मूळ संवर्गातील राहिल किंवा कसे ? | या योजनेअंतर्गत वरिष्ठश्रेणीत ज्या दिनांकापासून वेतननिश्चिती केली जाईल (दि.1.10.94 किंवा 12 वर्षे पूर्ण यापैकी जो नंतरचा असेल तो दिनाक) त्या दिनांकापासून 1 वर्षाचा कालावधी" झाल्यानंतर वरिष्ठ वेतनश्रेणीतील पुढील वेतनवाढ देय होईल. |
| 15. | उच्च वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करताना नियमित पदोन्नती प्रमाणे वेतननिश्चितीचा लाभ देण्यात येणार असल्याने या वेतन निश्चिती-करिता विकल्प अनुज्ञेय राहिल किंवा कसे ? | वरिष्ठ वेतनश्रेणीतील वेतननिश्चिती पदोन्नती प्रमाणे (अधिक जबाबदारीचे पद नसुनही) म.ना.सेवा (वेतन) नियम 1981 च्या नियम 11(1)(ए) प्रमाणे करावयाची असल्याने कर्मचा-यास शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पीएवाय-1082/सीआर-1100(एक)/एसईआर-3, दिनाक 6 नोव्हेंबर, 1984 अनुसार वेतननिश्चितीसाठी त्या आदेशातील इतर अटी व शर्तींच्या-अधीन राहून अनुज्ञेय राहील. |
| 16. | दि.8.6.95 च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार वरिष्ठ वेतनश्रेणी दिल्यावर व नियमित पदोन्नतीसाठी कर्मचारी अपात्र ठरल्यावर त्यास परत मूळ पदावर पदावनत करावयाचे आहे. त्यानंतर त्यास नियमित पदोन्नतीनंतरचे वेतन कसे निश्चित करण्यात येईल ? पदोन्नतीच्या पदावरील पुढील वेतनवाढीसाठीं पूर्वी वरिष्ठ वेतनश्रेणीतील कालावधी गणला जाईल काय ? | नाही. नियमित पदोन्नतीस अपात्र ठरल्यावर मूळ पदावर पदावनत झाल्यानंतर मूळ पदाच्या वेतनश्रेणीत महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम 1981 च्या नियम 12 अनुसार वेतननिश्चिती केली जाईल.<br>तद्नंतर ज्यावेळी नियमित पदोन्नती मिळेल त्यावेळी पदोन्नतीच्या पदाच्या वेतनश्रेणीत नव्याने वेतननिश्चिती म.ना.से.(वेतन) नियम 1981 मधील नियम 11(1)(ए) अनुसार होईल. त्यासाठी पूर्वीच्या दि.8.6.95 च्या शासन निर्णयानुसार वरिष्ठ वेतनश्रेणीतील कालावधी किंवा वेतन याचा विचार करता येणार नाही. त्यामुळे अशा प्रकरणात पूर्वीचा वरिष्ठश्रेणीतील कालावधी पदोन्नतीच्या पुढील वेतनवाढीसाठी गणता येणार नाही. |

| 1. | 2. | 3. |
|---|---|---|
| 17. | दि.1.10.94 पूर्वीच 12 वर्षापेक्षा अधिक सेवा झालेली आहे आणि वेतनश्रेणीतील वेतनवाढीचा दिनांक 1 ऑक्टोबर असल्यास वरिष्ठ वेतनश्रेणीत वेतननिश्चिती कशी करावी? | दि.1.10.94 रोजी 12 वर्षे किंवा त्यापेक्षा अधिक नियमित सेवा झालेल्या म्हणजेच दि.1.10.94 रोजी वरिष्ठ वेतनश्रेणी मिळण्यास पात्र असलेल्या कर्मचाऱ्यांची मूळ वेतनश्रेणीतील वेतनवाढ दि.1.10.95 रोजी असल्यास प्रथम मूळ वेतनश्रेणीतील वेतनवाढ देऊन नंतर वरिष्ठ वेतनश्रेणीत वेतन निश्चिती करावी. दि.1.12.94 रोजी आगाऊ वेतनवाढी मिळाल्या असल्यास मूळ वेतनश्रेणीत आगाऊ वेतनवाढ मंजूर करून त्यानंतर वरिष्ठ वेतनश्रेणीत वेतननिश्चिती करण्यात यावी. |
| 18. | दि.8.6.95 च्या शासन निर्णयातील परि.2(न) अनुसार वरिष्ठ वेतनश्रेणी देण्यात आल्यावर मूळ वेतनश्रेणीतील विशेष वेतन मिळणार नाही. परंतु रोखपालास रोख रक्कम हाताळण्याकरिता विहित दराने विशेष वेतन मिळत असल्याने त्यास वरिष्ठ वेतनश्रेणीत सदर विशेष वेतन अनुज्ञेय होईल काय? | होय. रोखपालास मिळणारे विशेष वेतन हे वेतनश्रेणीस मंजूर केलेले नसून हाताळण्यात येणाऱ्या रोख रकमेवर अवलंबून आहे. वरिष्ठ वेतनश्रेणीनंतरदेखील कर्मचारी रोखपाल म्हणून काम करीत असेल तर त्यास पूर्वीप्रमाणेच रोख रक्कम हाताळण्याबाबतचे विशेष वेतन विहित दराने अनुज्ञेय होईल. |

एन-1133(5,000-11-95)-4.